महाराष्ट्र विकास सेवा मधील सहायक गट विकास अधिकारी, गट ब संवर्गातील अधिकाऱ्यांना पदस्थापना देण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

**शासन आदेश क्रमांकः** मविसे-११२३/प्र.क्र.६२/आस्था-३ अ
३ रा मजला, बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मंत्रालय, मुंबई-०१
तारीख: २२ जून, २०२३

**शासन आदेश :**

सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (४) व ४ (५) मधील तरतूदीनुसार, ग्राम विकास विभागातील श्री.संदीप रामचंद्र कोटकर व श्री.रतिलाल मऱ्याप्पा साळुंके, सहायक गट विकास अधिकारी या निलंबित अधिकाऱ्यांना विभागीय चौकशी व न्यायालयीन निर्णयाच्या अधिन राहून पुन:स्थापित करण्याबाबत निलंबन आढावा समितीने घेतलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने आणि नागरी सेवा मंडळाने केलेल्या शिफारशीस अनुसरून, बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने श्री.संदीप रामचंद्र कोटकर व श्री.रतिलाल मऱ्याप्पा साळुंके, सहायक गट विकास अधिकारी यांचे पदस्थापनेचे आदेश शासन देत आहे. संबंधित अधिकाऱ्यांना त्यांच्या नावासमोरील स्तंभ क्रमांक ३ मध्ये दर्शविलेल्या पदावर पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव, सध्या धारण केलेले पद व ठिकाण | पदस्थापनेचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.संदीप रामचंद्र कोटकर, सहायक गट विकास अधिकारी (नियुक्ती शिवाय) | सहायक प्रकल्प अधिकारी (संनियंत्रण), जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जिल्हा अमरावती | रिक्त पदी |
| २ | श्री.रतिलाल मऱ्याप्पा साळुंके, सहायक गट विकास अधिकारी (नियुक्ती शिवाय) | सहायक प्रकल्प अधिकारी (संनियंत्रण), जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जिल्हा सोलापूर | रिक्त पदी |

०२. सदर आदेश तात्काळ अंमलात येत असून, उक्त अधिकाऱ्यांनी पदस्थापना दर्शविण्यात आलेल्या पदावर तात्काळ रूजू व्हावे.

०३. संबंधित विभागीय आयुक्त/मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी सदर आदेशाची तात्काळ अंमलबजावणी करून श्री.संदीप रामचंद्र कोटकर व श्री.रतिलाल मऱ्याप्पा साळुंके यांना पदस्थापनेच्या पदावर रूजू करून घ्यावे व केलेल्या कार्यवाहीचा अनुपालन अहवाल शासनास उलट टपाली/ई-मेलद्वारे सादर करावा. संबंधित अधिकाऱ्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक : सीडीआर १०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.०८.१९८२ च्या शासन परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. संबंधित अधिकाऱ्यांनी पदस्थापनेत बदल/नियुक्ती रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरूपाची आवेदने सादर केल्यास, सदर शासन परिपत्रकात दिलेल्या सूचना लक्षात ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील, याची त्यांनी नोंद घ्यावी.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६२११५३०४०७२२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANDIP BHIMRAJ GAIKWAD

Digitally signed by SANDIP BHIMRAJ GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=89c48a324e9cda6e93e2accf10f16b2496fc3b6646265c89c7aaed63f36483ff, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D2D6FEEC394D12102E6643D56C031FC6299A6B4B20290E33B011672396D5ABE5, cn=SANDIP BHIMRAJ GAIKWAD
Date: 2023.06.22 13:38:33 +05'30'

**(संदिप गायकवाड)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.प्रधान सचिव (ग्रा.वि. व पं.रा.), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र मुंबई/नागपूर.
६. विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे विभाग, पुणे.
७. विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय, अमरावती विभाग, अमरावती.
८. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, वाशिम, अमरावती, सांगली व सोलापूर.

९. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा , वाशिम, अमरावती, सांगली व सोलापूर.
१०. संबंधित अधिकारी (संबंधित विभागीय आयुक्त/मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांचे मार्फत).
११. अवर सचिव (आस्था-२), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती, कार्यासन आस्था-३ अ, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.